"महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग" कार्यालयातील पदांचा सुधारीत आकृतीबंध - पुरकपत्र.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन पुरकपत्र क्र. GAD/६१/२०२५/GAD-Lokshahidin**
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई
दिनांक :- २४ एप्रिल,२०२५

**वाचा :- १) शासन निर्णय क्र. आरटीएस-२०२१/प्र.क्र.११/लो.दि.कक्ष, दि. ०८.०६.२०२३**

**शासन पुरकपत्र :-**

**उपरोक्त वाचा येथील शासन निर्णयातील मुद्दा क्रमांक २ खालीलप्रमाणे आहे** :-

तसेच उच्चस्तरीय समितीच्या दि. १६ सप्टेंबर, २०२२ च्या बैठकीतील निर्णयानुसार व कार्यासन-१४, सामान्य प्रशासन विभागांनी दिलेल्या अभिप्रायानुसार :-

महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोगावरील उप सचिव हे पद सामान्य प्रशासन विभागामार्फत संवर्ग नियंत्रण करणा-या कार्यासनाकडून (सामान्य प्रशासन विभाग- कार्यासन-१४) अधिकारी यांची इच्छुकता विचारात घेऊन प्रतिनियुक्तीने भरण्यात येईल.

तसेच महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोगावरील कक्ष अधिकारी व सहायक कक्ष अधिकारी ही पदे सामान्य प्रशासन विभागामार्फत संवर्ग नियंत्रण करणा-या कार्यासनांकडून (सामान्य प्रशासन विभाग कार्यासन- १४-अ/१४-ब) अधिकारी/कर्मचारी यांची इच्छुकता विचारात घेऊन प्रतिनियुक्तीने भरण्यात येतील.

२. **आता मुद्दा क्रमांक २ मध्ये सुधारणा करण्यात येत असून तो खालीलप्रमाणे वाचावा**.

अ) महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोगाच्या कार्यालयातील उप सचिव पदावरील नियुक्ती ही, मंत्रालयातील कोणत्याही विभागातील उप सचिवाचे पद धारण करण्याऱ्या किंवा राज्य शासनाच्या कोणत्याही कार्यालयातील उपसचिव पदाचे समतुल्य पद धारण करणा-या एखाद्या योग्य व्यक्तीच्या प्रतिनियुक्तीद्वारे करण्यात येईल.

आ) महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोगाच्या कार्यालयातील कक्ष अधिकारी पदावरील नियुक्ती ही, मंत्रालयातील कोणत्याही विभागातील कक्ष अधिकारी पद धारण करण्याऱ्या किंवा राज्य शासनाच्या कोणत्याही कार्यालयातील कक्ष अधिकारी पदाचे समतुल्य पद धारण करणा-या एखाद्या योग्य व्यक्तीच्या प्रतिनियुक्तीद्वारे करण्यात येईल.

इ) महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोगाच्या कार्यालयातील सहायक कक्ष अधिकारी पदावरील नियुक्ती ही, मंत्रालयातील कोणत्याही विभागातील सहायक कक्ष अधिकारी पद धारण करण्याऱ्या किंवा राज्य शासनाच्या कोणत्याही कार्यालयातील सहायक कक्ष अधिकारी

पदाचे समतुल्य पद धारण करणा-या एखाद्या योग्य व्यक्तीच्या प्रतिनियुक्तीद्वारे करण्यात येईल.

३. महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोगाच्या कार्यालयातील प्रतिनियुक्तीने मंत्रालयीन संवर्गाव्यतीरिक्त अन्य संवर्गातील पदे भरण्याबाबतची कार्यवाही ही सामान्य प्रशासन विभाग/लोकशाही दिन कक्षामार्फत करण्यात येईल.

सदर शासन पुरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४२४१७०५३२९४०७ असा आहे. हे पुरकपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DILIP N DESHPANDE

Digitally signed by DILIP N DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=04b1da429ec9f808e2f142fb8df848a9c440a68828f957571e8bbc53318e3a6f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9A444B962C8442B754FC8343183DBEA1519A71F4D0CD0A5CCA8BF9534EF3A0A8, cn=DILIP N DESHPANDE
Date: 2025.04.24 17:06:19 +05'30'

**( दिलीप देशपांडे )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे प्रधान सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
४) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
५) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य.
७) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
८) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
९) महासंचालक, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ,
१०) सर्व विभागीय आयुक्त,
११) मुख्य आयुक्त,राज्य सेवा हक्क आयोग,मुंबई.
१२) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय,विधान भवन,मुंबई.
१३) सर्व जिल्हाधिकारी/ महानगरपालिका आयुक्त,
१४) सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख,
१५) प्रादेशिक प्रमुख/कार्यालय प्रमुख,
१६) महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई.
१७) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
१८) निवड नस्ती ( लोकशाही दिन कक्ष) सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई.